महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील अधिकाऱ्यांना महसुली विभागाबाहेर पदस्थापना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृषिआ १०२२/प्र.क्र.१४७/१६अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई -३२.
दिनांक : ३१ मे, २०२३

संदर्भ :- १) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि.१४.०७.२०२१
२) शासन आदेश क्र.कृषिआ-१०२१/प्र.क्र.११०/१६अे, दि.१८.०१.२०२२
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.आ.पुणे/नस्ती/आस्थापना शाखा-४/२०२३/४७/१७०६८, दि.२२.०५.२०२२

**शासन निर्णय :-**

कृषि पर्यवेक्षक (गट-क) संवर्गातील (वेतनश्रेणी एस-१३ रु.३५,४००-१,१२,४००) या संवर्गातील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) (एस-१५ रु.४१,८००-१,३२,३००) या संवर्गात त्यांना वाटप झालेल्या महसूली विभागात उपरोक्त दि.१८.०१.२०२२ रोजीच्या आदेशानुसार पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली आहे.

२. श्री.दिनेश लक्ष्मण लंबे, कृषि अधिकारी हे दिव्यांग प्रवर्गातील असल्यामुळे त्यांना महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) संवर्गात पदोन्नती देताना कोकण-१ महसुली विभागात देण्यात आलेली पदस्थापना बदलून अमरावती विभागात पदस्थापना देण्याबाबत विनंती केली होती. श्री. लंबे यांनी महसुली विभाग बदलून देणेबाबत सादर केलेले दस्तऐवज आणि कृषि आयुक्तालयाचा अहवालाच्या आधारे तसेच कोकण-१ महसुली विभागात एक वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी सेवा केली आहे, ही बाब विचारात घेऊन, या शासन आदेशान्वये श्री. दिनेश लक्ष्मण लंबे यांना "कोकण-१" ऐवजी "अमरावती" हा महसुली विभाग बदलून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री. लंबे यांना स्तंभ क्र. ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव व सध्याची पदस्थापना | सध्याचा महसुली विभाग | बदलून दिलेला महसुली विभाग | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.दिनेश लक्ष्मण लंबे, कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, मालवण जि. सिंधुदुर्ग | कोकण-१ | अमरावती | मंडळ कृषि अधिकारी, आमडापूर ता. चिखली, जि.बुलढाणा (रिक्त पदी) |

४. उपरोक्त अधिकाऱ्याने तात्काळ बदलीच्या पदावर रूजू व्हावे.

५. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५३११६३१४०५००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARITA RISHI
BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.05.31 16:32:52 +05'30'

**( सरिता बांदेकर-देशमुख )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अ.मु.स.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्विय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
८. संबंधीत विभागीय कृषि सह संचालक
९. संबंधीत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/उपविभागीय कृषि अधिकारी
१०. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१२. सर्व संबंधित अधिकारी
१३. निवड नस्ती /१६अे.